**<u>वित्तीय मान्यता</u>**
**खरीप हंगाम सन २०२३ करीता युरिया व डीएपी खताचा संरक्षित साठा (Buffer Stock) करण्यासाठी आलेल्या खर्चाच्या प्रतिपूर्तीसाठी निधी वितरीत करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : खसंसा ३५२३/प्र.क्र. ५९/१७-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, विस्तार, मुंबई ४०००३२
दिनांक :- २१/०३/२०२४

<u>वाचा:-</u>

१. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्रमांक खसंसा ३५२३/ प्र.क्र. ५९/१७-अे, दि. ०९/०५/२०२३
२. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्रमांक खसंसा ३५२३/ प्र.क्र. ५९/१७-अे, दि. २४/०१/२०२४
३. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ/ खते/ गुनि ३-४/ बफर /२३-२४/ ५४५९/२०२३, दि. १६/०२/२०२४.

<u>प्रस्तावना:</u>

वाचा येथे नमूद क्र. १ येथील दिनांक ०९/०५/२०२३ च्या शासन निर्णयान्वये, राज्यात खरीप २०२३ मध्ये युरिया खताचा ०.५० लाख मे. टन व डिएपी खताचा ०.२५ लाख मे. टन संरक्षित साठा (Buffer Stock) करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. सदर प्रयोजनार्थ महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ मर्या., मुंबई, दि महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन लिमिटेड, मुंबई आणि दि विदर्भ को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन लिमिटेड, नागपूर यांना "नोडल एजन्सी" म्हणून नियुक्त करण्यात आले आहे. या नोडल एजन्सींना संरक्षित साठा करण्यास आलेल्या खर्चाची प्रतिपूर्ती करण्यासाठी वाचा येथे नमूद दि. २४/०१/२०२४ च्या शासन निर्णयान्वये लेखाशिर्ष २४०१८२०८ अंतर्गत मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीमधून रु. ६ कोटी इतका निधी वितरीत करण्यात आलेला आहे. तथापि, खतांचा संरक्षित साठा करण्यासाठी वरील तीनही एजन्सींना एकूण रु. ८,८६,२४,९४३/- लाख इतका खर्च झाला आहे. तरी, प्रतिपूर्तीसाठी देण्यात आलेल्या रक्कमेतील शिल्लक रक्कम वजा

जाता, महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ मर्या. या एजन्सीच्या देयकाच्या प्रतिपूर्तीसाठी रु. २,८६,२४,९४३/- इतका निधी वितरीत करण्याची विनंती वाचा येथे नमूद क्र. ३ येथील दि. १६/०२/२०२४ च्या पत्रान्वये संचालक (निवगुनि), कृषि आयुक्तालय, पुणे यांनी केली आहे. सदर विनंतीच्या अनुषंगाने देयकाच्या प्रतिपूर्तीसाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

राज्यात खरीप २०२३ मध्ये युरिया खताचा ०.५० लाख मे. टन व डिएपी खताचा ०.२५ लाख मे. टन संरक्षित साठा (Buffer Stock) करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुषंगाने नोडल एजन्सींच्या देयकाच्या प्रतिपूर्तीसाठी यापूर्वी दि. २४/०१/२०२४ च्या शासन निर्णयान्वये रु. ६ कोटी इतका निधी वितरीत करण्यात आलेला आहे. खतांचा संरक्षित साठा करण्यासाठी महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ मर्या., मुंबई, दि महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन लिमिटेड, मुंबई आणि दि विदर्भ को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन लिमिटेड, नागपूर या तीनही एजन्सींना एकूण रु. ८,८६,२४,९४३/- लाख इतका खर्च झाला आहे. त्याअनुषंगाने, महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ मर्या., मुंबई या एजन्सीच्या देयकाच्या प्रतिपूर्तीसाठी रु. २,८६,२४,९४३/- इतका निधी लेखाशिर्ष २४०१८२०८ अंतर्गत अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करण्यात आला आहे. सदरचा निधी वितरीत करण्यास कृषि आयुक्तालय, पुणे यांना वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर बाबीकरीता होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा :-

**मागणी क्रमांक : डी-३**
**१०५, खते व रासायनिक खते,**
**(००) (००) (३१) डीएपी व मिश्र रासायनिक खतांचा पुरवठा करण्यासाठी येणारा खर्च भागविण्याकरिता अर्थसहाय्य (कार्यक्रम)**
**३३, अर्थसहाय्य ( २४०१ ८२०८)**

३. कृषि आयुक्तालय स्तरावर आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे हे योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणून तसेच, सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे हे आहरण व संवितरण अधिकारी राहतील. संरक्षित साठा करण्यासाठी येणाऱ्या खर्चाची प्रतिपूर्ती करताना प्रचलित शासन निर्णय/ नियम/ परिपत्रक यामधील तरतूदीनुसार

अंमलबजावणी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/ अधिकारांचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ९९/२०२४/व्यय-१, दि. १८/०३/२०२४ अन्वये प्राप्त मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२११८२६३५०१०१ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by PIMPALE PRASHANT RAMESH
Date: 2024.03.21 18:35:43 +05'30'

**( प्रशांत र. पिंपळे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
३. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. सह सचिव (निवगुनि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ, गोरेगाव, मुंबई
७. दि.विदर्भ को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन लिमिटेड, नागपूर.
८. दि.महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन लिमिटेड, मुंबई.
९. प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर
१०.कृषि संचालक (नि.व गु.नि.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
११.कृषि सहसंचालक (आस्थापना), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२.सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१३.सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी / कृषि विकास अधिकारी.
१४.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१५.उप संचालक (खते), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१६.प्रशासन अधिकारी, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१७.वित्त विभाग (व्यय-१ , अर्थसंकल्प -१३ ), मंत्रालय, मुंबई
१८. वित्त विभाग (वित्तीय सुधारणा), मंत्रालय, मुंबई
१९.कार्यासन (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२०. १७-अे कार्यासन, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई (निवडनस्ती)